**राज्य योजना सन २०१८-१९**

वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना या योजनेचा (२४०६-२२३२) चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२००/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ०१.०२.२०१९.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे, शासन परिपत्रक, क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३२/(१७-१८)/१३९, दिनांक :- २६.०४.२०१८

३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२००/फ-१, दिनांक ०८.०५.२०१८.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३०/(१७-१८)/७१८, दिनांक :- २३.०७.२०१८.

५. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकानुसार सन २०१८-१९ मध्ये विविध योजनांतर्गत मंजूर नियतव्यया पैकी ७०% निधी वितरीत करण्यास विभागास परवानगी देण्यात आली आहे. त्यानुसार वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षातर्गत मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला नियतव्यय रु. ३००.०० लक्षच्या ७०% निधी म्हणजेच रु. २१०.०० लक्ष अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या रु. २१०.३८ लक्षच्या प्रस्तावापैकी संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये रु. २१०.०० निधी वितरीत करण्या आला आहे.

सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशीर्षाअंतर्गत जुन्नर वन विभागातील माणिकडोह बिबट निवारा केंद्र आणि पुणे वन विभागातील नव्याने स्थापित करण्यात येणाऱ्या उपचार केंद्रकरीता एकूण २२०.७६ लक्ष निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ च्या परिपत्रकानुसार सन २०१८-१९ मध्ये विविध योजनांतर्गत पूरवणी मागणी व्यतीरीक्त मंजूर नियतव्यया पैकी ८०% निधी वितरीत करण्यास विभागास परवानगी देण्यात आली आहे. त्यानुसार वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षांतर्गत रु. २४०.०० लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

आता वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ च्या परिपत्रकानुसार आतापर्यत वितरीत निधी रु. २१०.०० लक्ष वजा करुन रु. ३०.०० लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

**शासन निर्णय :-**

वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) या लेखाशिर्षांतर्गत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावापैकी वितरणासाठी शिल्लक रु. ०.३८ लक्ष तसेच अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये

शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या रु. ६१.२११९५ लक्षच्या प्रस्तावापैकी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ च्या परिपत्रकसान अनुसरुन वितरणासठी शिल्लक असलेला निधी लक्षात घेवून **रु. ३०.०० लक्ष** निधी सोबत जोडलेल्या तक्त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. सदर योजनेवर होणारा खर्च सन २०१८-१९ मध्ये लेखा शिर्ष  क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव, पंचवार्षिक योजनाअंतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१०) वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६-२२३२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

II. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

III. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७,  वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन ( संवर्धन ) अधिनियम १९८० तसेच राष्ट्रीय प्राणी संग्रहायलयाच्या मार्गदर्शक तत्वांचा भंग होणार नाही व आवश्यक ती परवानगी घेतली गेली आहे ह्याची दक्षता घ्यावी.

IV. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

V. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

VI. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

VII. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

VIII. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ ,दिनांक - १७.०४.२०१५,  वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक . अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे .

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र६९/अर्थ-३, दिनांक :- २५.०१.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१५०६०७८७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2019.02.02 15:08:01 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
५. मुख्य वनवसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
७. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
८. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२००/फ-१,**
**दिनांक :- ०१.०२.२०१९ च्या सोबतचे परिपत्रक.**

| अ.क्र. | वनवृत्त /विभागाचे नाव | एकूण रक्कम ( रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) पुणे | ०.३८ |
| २ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती. | ६.३१ |
| ३ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर. | २३.३१ |
| | **एकूण** | **३०.००** |

*****